महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील २२१० जी २८९ (TSP) या लेखाशिर्षाखाली निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन शुध्दीपत्रक क्रमांकः मफुयो-२०२४/प्र.क्र.८०/आरोग्य-६

गो.ते. रुग्णालय आवार, १० मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: १२ मार्च, २०२५.

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.मफुयो-२०२३/प्र.क्र.१६०/आरोग्य-६, दिनांक २८ जुलै, २०२३

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. ०१.०४.२०२४ व क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.०७. २०२४

३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२४/प्र.क्र.५/कार्यासन-६, दिनांक १२ ऑगस्ट, २०२४

४) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.मफुयो-२०२४/प्र.क्र.८०/आरोग्य-६, दिनांक २० ऑगस्ट, २०२४

५) आदिवासी विकास विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. बीयुडी-२०२/४प्र.क्र.०५/कार्यासन-६, दि. १३ फेब्रुवारी, २०२५

६) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. लेखाप्र-२०२४/प्र.क्र.२१७/LB/आरोग्य-६, दि. २० फेब्रुवारी, २०२५

७) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२४/प्र.क्र.५/कार्यासन-६, दिनांक ०६ मार्च, २०२५

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भाधीन १ येथील दि. २८.७.२०२३ च्या शासन निर्णयान्वये महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्मान भारत- प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या योजना विस्तारित स्वरूपात राज्यात अंमलबजावणी सुरू आहे. शासनमान्यतेनुसार आता सदर योजना दि. ०१.०७.२०२४ पासून राज्य आरोग्य हमी सोसायटीमार्फत हमी तत्वावर राबविण्यात येत आहे. महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी २२१० जी २८९ (TSP), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित रु.१७५.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर मंजूर निधीमधून राज्य आरोग्य हमी सोसायटीस संदर्भ क्र ३, ४ आणि ५ च्या शासन निर्णयान्वये रु. ६८.१० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला उर्वरित शिल्लक निधी मधून महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेंतर्गत अंगीकृत रुग्णालयांचे दावे अदा करण्यासाठी रु.२७,१४,६५,९३२/- (रुपये सत्तावीस कोटी चौदा लाख पासष्ट हजार नऊशे बत्तीस मात्र) इतका निधी २२१० जी २८९ (टीएसपी), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली राज्य आरोग्य हमी सोसायटीस वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयानूसार महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेची अंमलबजावणी राज्य आरोग्य हमी आरोग्य सोसायटीमार्फत होत असल्यामुळे योजनेंतर्गत अंगीकृत रुग्णालयांची दावे अदा करण्यासाठी रु. २७,१४,६५,९३२ (अक्षरी रुपये सत्तावीस कोटी चौदा लाख पासष्ट हजार नऊशे बत्तीस मात्र) एवढा सशर्त निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या ८४४३- नागरी ठेवी, १०६ वैयक्तिक लेखा, (००) (०२) आभासी वैयक्तिक ठेव लेखा खाते यामध्ये, आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक यांच्या नावे सुपुर्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरील निधी खालील लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. टी-०५**

| | | |
|---|---|---|
| २२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य |
| ०३ | - | ग्रामीण आरोग्य सेवा - विषम चिकित्सा |
| ७९६ | - | जनजाती क्षेत्र उपयोजना |
| (०१) | - | जनजाती क्षेत्र उप योजनांतर्गत योजना |
| (०१) (०६) | - | महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना (राज्य योजना) (टीएसपी) |
| २२१० जी २८९ (दत्तमत) ३१ | - | सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) |

**३.** महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

१) सदरचा निधी हा विस्तारीत महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेंतर्गत लाभार्थ्यांच्या आरोग्य संरक्षणापोटी रुग्णालयांच्या दाव्यांच्या अदायगीसाठी करण्यात यावा.

२) सदरचा निधी योजनेंतर्गत अंगीकृत रुग्णालयांचे दावे अदा केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना सादर करावे.

४. राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई या कार्यालयास निधीचा विनियोग करण्यासाठी "आभासी वैयक्तिक ठेव लेखा (Virtual Personal Deposit Account)" ही व्यवस्था संदर्भ क्र. ०६ येथील दिनांक २०.०२.२०२५ च्या शासन निर्णयान्वये लागू केलेली आहे. आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक यांनी वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११०/२०२३/कोषा प्रशा-५, दिनांक १४.०२.२०२४ व विभागाच्या संदर्भ क्र. ६ येथील दिनांक २०.०२.२०२५ मधील तरतुदींचे तंतोतंत पालन करावे. सदर अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

५. वित्त विभागाने परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३,दि.०१ एप्रिल, २०२४ व दिनांक २५.०७.२०२४ सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु. क्र. ८ मधील मूद्दा क्र. १ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे राज्य आरोग्य हमी सोसायटीने शासनास कळविले असून यापूर्वी शासनाकडून वितरीत केलेल्या निधीचा विनियोग ज्या कारणासाठी निधी मंजूर केला होता त्याच प्रयोजनासाठी केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. शासनाच्या धोरणानूसार सदर

प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या अंतर्गत नव्याने उघडण्यात आलेल्या आभासी वैयक्तिक ठेव लेखा खाते (Virtual Personal Deposit Account) मध्ये जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ०१.०४.२०२४ व दिनांक १४.०२.२०२४ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतूदींचे/ अटी व शर्तींचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून रु. २७,१४,६५,९३२ (अक्षरी रुपये सत्तावीस कोटी चौदा लाख पासष्ट हजार नऊशे बत्तीस मात्र) एवढा निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या अंतर्गत नव्याने उघडण्यात आलेल्या आभासी वैयक्तिक ठेव लेखा खाते (Virtual Personal Deposit Account) मध्ये जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ०१.०४.२०२४, दिनांक २५.०७.२०२४ व दिनांक १४.०२.२०२४ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतूदींचे/अटी व शर्तींचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

७. आदिवासी उप योजनेंतर्गत उपलब्ध झालेला निधी खर्च करताना आदिवासी विकास विभागाच्या दिनांक ०६.०३.२०२५ च्या शासन निर्णयामध्ये नमूद सर्व अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन राज्य आरोग्य हमी सोसायटीने करावे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौ. संदर्भ **ई-ऑफिस, संगणक क्रमांक -७६३३७८** नोट क्र. **१२३, दिनांक ०१.०३.२०२५** अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून व आदिवासी विकास विभागाच्या दिनांक ०६.०३.२०२५ च्या शासन निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेताक २०२५०३१२१७४०५४८२१७ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NEELAM GIRISH SANGWAI

Digitally signed by NEELAM GIRISH SANGWAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Public Health Department,
2.5.4.20=a9bbc429d62201a67249f70e60acdfadbff901fbbbf45cc393dbd6aa91fbd6ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=81e4e52421d72a2ae32df6c7d06abb4e6a7b5820c3a929f328ad6c0dca4f38c7, cn=NEELAM GIRISH SANGWAI
Date: 2025.03.12 17:41:38 +05'30'

**(नीलम संगवई)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई.
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई (३ प्रती).
९. नियोजन विभाग (कार्यासन१४७२), मंत्रालय, मुंबई.
१०. आदिवासी विकास विभाग (कार्यासन-६),मंत्रालय,मुंबई.
११. वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१४/अर्थसंकल्प-१९, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती.